**महाराष्ट्र खनिज विकास निधी अंतर्गत परभणी जिल्ह्यातील पर्यावरण विषयक अभ्यासाकरिता आलेल्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एमडीएफ-०८१५/प्र.क्र.५२/ उद्योग-९

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०९.१०.२०१५.

राज्य खनिज धोरण १९९९ मधील धोरणाशी सुसंगत राहून महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजना) निधी अधिनियम २००१ अन्वये महाराष्ट्र खनिज विकास निधीची निर्मिती करण्यात आली आहे.या निधीतून हाती घ्यावयाच्या व शासन निर्णय क्र. एमडीएफ-१०१० / प्र.क्र.१०३७ / उद्योग - ९, दि.०१.०८.२०१२ मधील मार्गदर्शक तत्वानुसार पात्र ठरणाऱ्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

१. महसूल व वन विभागाच्या दिनांक १२.०३.२०१३ च्या शासन निर्णयानुसार ५ हेक्टर वरील क्षेत्र असलेल्या वाळू गटाचा लिलाव करण्यापूर्वी त्या वाळू गटाचा EIA व EMP अभ्यास करून राज्य पर्यावरण समितीसमोर त्याचे सादरीकरण करणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर यांनी परभणी जिल्ह्यातील वाळू गटांचा EIA व EMP अभ्यास करण्यासाठी आलेल्या खर्चास खनिज विकास निधीतून मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

जिल्हाधिकारी परभणी यांनी या जिल्ह्यातील वाळू गटांचा EIA व EMP अभ्यास करण्यासाठी खालील EIA Consultant यांची नियुक्ती केली होती

| अ.क्र. | जिल्हा | EIA Consultant |
|---|---|---|
| १. | परभणी | मे. एन्व्हायरोटेक्नो कन्सलटन्ट लि. नागपूर |

२. या EIA Consultant यांनी संबंधित जिल्हातील वाळू गटांचा EIA व EMP अभ्यास करून अहवाल सादर केलेला आहे. खनिज विकास निधीच्या वापर व वाटपा संदर्भात निर्गमित केलेल्या दिनांक ०१.०८.२०१२ च्या शासन निर्णयानुसार EIA व EMP अभ्यास करण्यासाठी येणारा खर्च खनिज विकास निधीतून अनुज्ञेय करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने परभणी जिल्ह्यातील ८ रेतीघाटांचा EIA व EMP अभ्यास करण्यासाठी आलेल्या एकूण रुपये २०,२२,४८०/- ( रुपये वीस लक्ष बावीस हजार चारशे ऐंशी फक्त ) इतक्या खर्चास पुढ़ील प्रमाणे या आदेशाद्वारे प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | जिल्हा | EIA Consultant | रक्कम ( रुपये ) |
|---|---|---|---|
| १. | परभणी | मे. एन्व्हायरोटेक्नो कन्सलटन्ट लि. नागपूर | २०,२२,४८०/- |

३. या प्रयोजनावरील खर्च मागणी क्र.के-७ मुख्यलेखाशीर्ष "२८५३, अलोह खनिकर्म व धातुविषयक उद्योग-०२ खाणींचे विनियमन व विकास- १०२ खनिज समन्वेषण-(००) (०५)" खनिज विकास ( योजनेतर ) ( २८५३ ०१३ २ )या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व या शीर्षाखाली महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ नागपूर यांना सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून भागाविण्यात यावा.

४. सदर प्रशासकीय मान्यता महाराष्ट्र खनिज विकास ( निर्मिती व उपयोजना ) निधी अधिनियम २००१ च्या कलम ७ ( १ ) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००९१२५६४६३७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Narendra Vaishnav

Digitally signed by Mahesh Narendra Vaishnav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Narendra Vaishnav
Date: 2015.10.12 10:36:15 +05'30'

**(म. न. वैष्णव)**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर.

२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी.

३) निवडनस्ती ( उद्योग-९ )